

# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

८६) श्री ललिता पंचरत्नम् - १

प्रातः स्मरामि ललितावदनारविन्दं
बिम्बाधरं पृथुलमौक्तिकशोभिनासम् ।
आकर्णदीर्घनयनं मणिकुण्डलाढ्यं
मन्दस्मितं मृगमदोज्ज्वलभालदेशम् ।।१।।

आई जगदंबेचे एक नितांत सुंदर नाव आहे ललिता. कोमल, मनोज्ञ, चित्ताकर्षक असा या शब्दाचा अर्थ. आई जगदंबेचे स्वरूप तसेच आहे.

शाक्त उपासनेतील दशमहाविद्या मध्ये देवी त्रिपुरसुंदरी स्वरुपात ललितांबेचे अर्चन केले जाते.

त्या ललितांबेचे स्तवन करताना पूज्यपाद आचार्य श्री म्हणतात,

प्रातः स्मरामि ललितावदनारविन्दम् - मी सकाळी आई ललितांबेच्या वदन अरविंद अर्थात मुखकमलाचे स्मरण करतो.

यातील स्मरण शब्द अधिक सुंदर आहे. आई जगदंबेचे दर्शन घ्यायचे तर किमान देवघरापर्यंत जावे लागेल. पण स्मरणासाठी त्याची आवश्यकता नाही. अगदी आंथरुणात पडल्यापडल्या पडता, डोळे न उघडतात देखील स्मरण शक्य आहे. अर्थात प्रत्यक्ष कोणतीही शारीरिक क्रिया करण्याच्याही पूर्वी आईचे स्मरण हा प्राधान्याचा विषय आहे. हा भाव.

कसे आहे आईचे मुखकमल?

बिम्बाधरं- बिंब अर्थात उगवता सूर्य किंवा पिकलेली गुंज. ज्याप्रमाणे लालबुंद असे अधर म्हणजे ओठ असणारी. जगातील सर्वाधिक आकर्षक रंग आहे लाल. त्यामुळे स्वाभाविक पहिली नजर गेली ती लाल रंगाचा ओठांकडे.

पृथुल म्हणजे टपोरा, मोठा.मौक्तिक म्हणजे मोती. शोभिनासम् म्हणजे नासिका असणारी. अर्थात आई जगदंबेच्या नाकात मोठ्या मोत्याची नथ घातली आहे.

सामान्यतः सकाळी या अवयवाचे स्मरण करू नये , नाव काढू नये असे संकेत आहेत. ते अपशकुनी मानले आहे .पण आई जगदंबेच्या बाबतीत सर्वच गोष्टी शुभच असतात.

आकर्णदीर्घनयनं- कानापर्यंत जिचे नयन अर्थात पापण्या किंवा भुवया लांबलेल्या आहेत अशी. मणिकुण्डलाढ्यं- त्या कानांमध्ये दिव्य रत्न युक्त कुंडलांनी शोभून दिसणारी.

मन्दस्मितं- आईच्या मुखावर मंदस्मित झळकत आहे. मृगमद- मृगाच्या नाभीतून मिळणारी कस्तुरी. उज्ज्वलभालदेशम्- त्या कस्तुरीच्या तिलकाने जिचा भालप्रदेश अर्थात कपाळ उजळले आहे अशी.

अशा अवयवांनी युक्त असलेल्या आईच्या मुखकमळाचे मी स्मरण करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

८७) श्री ललिता पंचरत्नम् -२

प्रातर्भजामि ललिताभुजकल्पवल्लीं रक्तांगुलीय-लसदंगुलि-पल्लवाढ्याम्।
माणिक्य-हेम-वलयांगद-शोभमानां पुण्ड्रेक्षु-चाप-कुसुमैषु-सृणीर्दधानाम्।।२।।

आई ललितांबेच्या मुखकमलाचे स्मरण केल्यानंतर प्रस्तुत श्लोकात पूज्यपाद आचार्य श्री आई जगदंबेच्या हस्त कमलाचे वैभव विशद करीत आहेत. ते म्हणतात,

प्रातर्भजामि- मी सकाळी आराधना करतो, स्मरण करतो. ललिताभुजकल्पवल्लीं- आई ललितांबेच्या हाताचे. जे कल्पवल्ली प्रमाणे आहेत. अर्थात एकदा हा हात मस्तकावर असला की काय वाटेल ते प्राप्त होते. मनात येताच हवे ते मिळते.

रक्तांगुलीय- लाल रंगाच्या अंगठ्या,

लसद्- त्याने चकाकणारी,

पल्लवाढ्याम्- जणू पालवी प्रमाणे अत्यंत सुंदर असणारी.

अंगुली- बोटे.

आई जगदंबेच्या हातातील बोटात लाल रंगाच्या अंगठ्या शोभून दिसतात. लाल सर्वाधिक हा आकर्षक रंग आहे. त्यामुळे अत्यंत आकर्षक अंगठ्या असाही अर्थ होतो.

आईचा हात गोरापान असल्यामुळे त्यावर लाल रंग सुंदर दिसतो त्यामुळे लाल रंगाच्या, असाही अर्थ होतो.

माणिक्य- माणिक नावाच्या लालबुंद रत्नांपासून बनविलेले,

हेमवलय- सोन्याची कंकणे,

अंगद- बाजूबंद, वाकी इत्यादी हातातील अलंकार.

शोभमानां- या सगळ्यांनी आईचे हात शोभून दिसत आहेत.

आई ललितेचे स्वरूप चतुर्भुज असते. या चार हातांमध्ये,

पुण्ड्रेक्षु- लाल रंगाचा ऊस.

चाप- धनुष्य

कुसुमैषु- इषु म्हणजे बाण. फुलांचे बाण.

सृणी:- अंकुश.

दधानाम्- धारण करणाऱ्या, या हातांचे मी स्मरण करतो.

आईला चार हात आहेत. अर्थात धर्म, अर्थ, काम, मोक्ष हे चारही पुरुषार्थ आईच्या हातात आहेत.

यात रसपूर्ण फल देणारा ऊस धर्माचे, पराक्रमाची माध्यम असणारे धनुष्य अर्थाचे, फुलांचे बाण हे कामाचे तर आत्म नियमनकारी अंकुश हे मोक्षाचे प्रतीक आहे.

या चारही गोष्टी आईच्या हातात आहेत.

आपल्या भक्तांना हे सर्व देते म्हणून त्या हातांचे स्मरण.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

८८) श्री ललिता पंचरत्नस्तोत्रम् -३

प्रातर्नमामि ललिताचरणारविन्दं भक्तेष्टदाननिरतं भवसिन्धुपोतम्।
पद्मासनादि-सुरनायक-पूजनीयं पद्मांकुश-ध्वज-सुदर्शन-लांछनाढ्यम्।।३।।

यानंतर पूज्यपाद जगद्गुरु आदि शंकराचार्य स्वामी महाराज आई ललितांबेच्या चरणकमलांचे वंदन करीत आहेत. त्यांचे वर्णन करीत आहेत.

प्रातर्नमामि- मी रोज सकाळी वंदन करतो. ललिताचरणारविन्दम्- आई जगदंबेच्या, श्रीललितेच्या चरणकमलांना.

कशी आहेत ही चरणकमले?

भक्तेष्टदाननिरतम् - भक्तांना इष्ट म्हणजे योग्य ते प्रदान करणारे.

यातील इष्ट शब्द अत्यंत महत्त्वाचा आहे. इष्ट म्हणजे योग्य ,चांगले ,समर्पक. आई जगदंबेच्या चरणाशी योग्य तेच मिळते. आपल्याला हवे ती नाही. कारण अनेकदा आपल्याला जे हवे असते ते आपल्यासाठी योग्य नसते. मात्र आईला नेमके समजते की आपल्या बाळाला काय योग्य आहे? आई ललितांबेचे चरण साधकांना इष्ट ते प्रदान करतात.

भवसिन्धुपोतम्- हे चरण साधकांच्या साठी, भव म्हणजे संसार, सिंधू म्हणजे सागर, पार करण्यासाठी साधन असणारी, पोतं म्हणजे नाव,बोट ठरत असतात.

पद्मासनादि- आईची ही चरणकमले कमळावरच स्थापित असतात.

सुरनायक पूजनीयम्-

सुर म्हणजे देवता. त्यांचे नायक अर्थात देवराज इंद्र. त्यांच्या द्वारे पूजन केल्या गेलेले.

अशा त्या आईचा सुंदर चरणकमलांवर असणाऱ्या चिन्हांची सूची देतांना आचार्यश्री म्हणतात, पद्म- कमळ

अंकुश,ध्वज,सुदर्शन अर्थात चक्र यांच्या लांछन- अर्थात चिन्हांनी

आढ्यम्- अर्थात सर्वश्रेष्ठ ठरणारी ती आईची चरणकमले मी प्राप्त काळी वंदितो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

८९) श्री ललिता पंचरत्नम्- ४

प्रातः स्तुवे परशिवां ललितां भवानीं त्र्यन्तवेद्यविभवां करुणानवद्याम्।
विश्वस्य सृष्टि-विलय-स्थितिहेतुभूतां
विद्येश्वरीं निगमवाङ्मनसाविदूराम्।।४।।

प्रातः स्तुवे - प्रातःकाळी अर्थात सूर्योदयाच्या देखील पूर्वी, डोळे देखील उघडण्याच्या आधी, मी स्तुती करतो.

परशिवां- पर म्हणजे अत्यंत श्रेष्ठ. शिव म्हणजे अत्यंत पवित्र. अत्यंत श्रेष्ठ आणि पवित्र असणारी.

ललितां- अत्यंत लालित्यपूर्ण असणारी.

भवानीं- भव म्हणजे भगवान शंकर. त्यांची चैतन्यशक्ती ती भवानी.

त्र्यन्त- कोणत्याही वेदांचे संहिता, आरण्यक, ब्राह्मण आणि उपनिषद असे चार भाग असतात. उपनिषद हा चौथा भाग असल्याने त्याला, तीनच्या नंतर असणारा म्हणून त्र्यन्त म्हटले. अर्थात त्र्यन्त म्हणजे उपनिषद ,वेदान्त.

वेद्यविभवां- वेद्य म्हणजे स्पष्ट करण्याचे, जाणवून देण्याचे. तर विभव म्हणजे वैभव .

अर्थात वेदांत तत्वज्ञानी जिचे वैभव स्पष्ट करते अशी. त्याद्वारे जिला जाणता येते अशी.

करुणानवद्याम्- करुणा अर्थात दया. अनवद्या अर्थात निर्दोष. सामान्य व्यवहारात दये मध्ये समोरच्याला आपल्यापेक्षा हीन समजणे आणि त्याच्यावर उपकार करणे. हा भाव असतो. तो दोष नसलेली दया म्हणजे वात्सल्याने आई परिपूर्ण आहे.

विश्वस्य - विश्वाच्या. सृष्टि-निर्मिती.

विलय- प्रलय, विनाश.

स्थिति- संचालन.

हेतुभूतां - या सगळ्याचे मूळ कारण असणारी.

विद्येश्वरीं- सर्व प्रकारच्या विद्या अर्थात ज्ञानाचे अधिष्ठान असणारी. निगम- वेदादि शास्त्रे, वाङ्मनसा- वाणी आणि मनाने

विदूराम्- प्राप्त होणे असंभव असलेली.

अशा आई ललितांबेचे मी स्तवन करतो.



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

९०) श्री ललिता पंचरत्नस्तोत्रम्-५

प्रातर्वदामि ललिते तव पुण्यनाम- कामेश्वरीति कमलेति महेश्वरीति।
श्रीशाम्भवीति जगतां जननी परेति वाग्देवतेति वचसा त्रिपुरेश्वरीति।।५।।

पाश्चात्य साहित्यातील एक वाक्य प्रसिद्ध आहे, नावात काय ठेवले आहे? अर्थात त्याचा संदर्भ जरी वेगळा असला तरी, नावात काय ठेवले आहे? हा प्रश्न पाश्चात्यांनाच पडू शकतो. भारतीय संस्कृती तर सरळ सांगते जे काय ठेवले आहे ते नावातच ठेवले आहे. नामातच ठेवले आहे.

भगवंताचे नाम ही भक्ताची सर्वात आवडती गोष्ट. नामाच्या आधारे नामी पर्यंत पोहोचणे हे साधनेचे वर्म.

प्रस्तुत श्लोकात पूज्यपाद आचार्यश्री आई लालितेच्या विविध नावांचा विचार प्रस्तुत करीत आहेत.

आरंभी स्मरण, त्यानंतर वंदन आणि आता नामोच्चारण.

बौद्धिक स्तरावर स्मरण, मानसिक स्तरावर वंदन आणि शरीराच्या मुखाने सातत्याने नामोच्चारण अशी ही रचना.

त्यासाठी आचार्य म्हणतात,

प्रातर्वदामि- मी सकाळी बोलतो. नाम घेतो.

वचसा- वाणीने.

ललिते - हे आई ललितांबे !

तव पुण्यनाम- तुझी पुण्यदायक नावे.

कोणकोणती आहेत ही नावे? तर

कामेश्वरी- सकल कामनांची ईश्वरी. अर्थात भक्तांच्या सकलं कामना पूर्ण करणारी.

कमला- कमळामध्ये निवास करणारी. कमळाप्रमाणे उर्ध्वगामी वृत्ती असणारी. ती वृत्ती प्रदान करणारी.

महेश्वरी- महेश्वराची सहलीलाचारीनी.

श्रीशाम्भवी- शंभू अर्थात भगवान शंकर.

शम् म्हणजे कल्याण. तर भू म्हणजे निर्माण होणे. ज्यांच्या चरणाशी जगाचे कल्याण निर्माण होते ते शंभू. त्यांची चैतन्यशक्ती ती शंभूची शांभवी.

जगतां जननी - सकल विश्वाची जननी. आदिशक्ती. मूळमाया.

परा- परा शब्दाचा अर्थ आहे श्रेष्ठ.

परा हा एक वाणी चा प्रकार देखील आहे. चौथ्या प्रकारच्या या वाणीत साधकाला अखंड ओंकार नाद ऐकू येतो. तो ओंकार आईचे स्वरूप आहे .

वाग्देवता- वाणीची देवता. जगातील सर्वच पशूंना कोणत्या ना कोणत्या स्वरूपात आवाज काढता येतो. त्यांना देखील ध्वनी आहे. पण त्यांना वाणी नाही. त्यांना आपल्या मनातील सर्व भावना पाहिजे तशा बोलता येत नाही. वाणी हे माणसाचे वैभव आहे. आई ललिता त्या वाणीची देवता आहे. सोप्या शब्दात ती आपल्याला मनुष्यत्व प्रदान करणारी आहे.

त्रिपुरेश्वरी- या आई जगदंबा ललितेची उपासना श्री त्रिपुरसुंदरी रूपात केली जाते.

त्रिपुर शब्दाचा अर्थ स्वर्ग, मृत्यु ,पाताळ. तर देहाच्या बाबतीतला अर्थ स्थूल, सूक्ष्म आणि कारण देह. या सगळ्यांची स्वामिनी.

सकाळी मी वाणीने तिचे भजन करतो.

हिंदुस्थान



# श्रीशांकर स्तोत्ररसावली

विद्यावाचस्पती
प्रा. स्वानंद गजानन पुंड
९८२२६४४६११

९१) श्री ललिता पंचरत्नस्तोत्रम्- ६

यः श्लोकपंचकमिदं ललिताम्बिकायाः सौभाग्यदं सुललितं पठति प्रभाते।

तस्मै ददाति ललिता झटिति प्रसन्ना विद्यां श्रियं विमलसौख्यमनन्तकीर्तिम्।।६।।

फलश्रुती स्वरूप असणाऱ्या या अंतिमत श्लोकात आचार्य श्री ललितांबेच्या कृपेचे वैभव सांगत आहेत.

ते म्हणतात,

यः - जो कोणी, श्लोकपंचकम् इदं - हे श्लोकपंचक. हा पाच श्लोकांचा समुदाय. ललिताम्बिकायाः- देवी ललितांबेतेच्या, प्रार्थना स्वरुप असलेला,

सौभाग्यदं - सौभाग्य दायक असलेला, सुललितं - लालित्यपूर्ण असलेला.

पठति प्रभाते- सकाळच्या वेळी पठण करतो.

तस्मै - त्याच्यावर ललिता झटिति प्रसन्ना - आई ललिता चटकन प्रसन्न होते.

आणि त्याला,

ददाति- प्रदान करते.

काय काय प्रधान करते ती सूची सादर करताना आचार्य श्री म्हणतात,

विद्यां - विद्या अर्थात अध्यात्मविद्या, मोक्षविद्या, आत्मज्ञान.

श्रियं- अर्थात वैभव विमलसौख्य- शुद्ध सुख. अर्थात इतर कोणाच्याही दुःखाला कारणीभूत न होणारे सुख.

सामान्य व्यवहारात माझे सुख कोणाच्या तरी दुःखावर अवलंबून असते. उदाहरणार्थ, प्राध्यापक म्हणून मला सुख मिळायचे असेल असेल तर माझ्या विद्यार्थ्यांना वर्षभर अभ्यासाचे दुःख सहन करावे लागेल.

मुलाला खाण्याचे सुख मिळायचे असेल तर आईला स्वयंपाक करण्याचे दुःख भोगावे लागते.

त्यामुळे व्यवहारातील सुख निर्भेळ नाही. निर्भेळ सुख एकच. आत्मसुख. आईच्या कृपेने ते प्राप्त होते

अनन्तकीर्तिम्- कधीच न संपणारी कीर्ती.

हे अंतिम पद फार महत्त्वाचे आहे. जगात स्वार्थाने लोक समोर करतात ती स्तुती, प्रसिद्धी. पण आपल्या मागे लोक आपल्याबद्दल जे गौरवोद्गार काढतात ती कीर्ती. की खरी असते. कारण त्यात स्वार्थ नसतो.

आई ललितांबेच्या कृपेने साधकाला अशी कीर्ती प्राप्त होते. अशी कीर्ती मिळावी असे कार्य त्यांच्या हातून घडते. जी शाश्वत असते .चिरंतन असते.

त्यासाठी तिचे हे स्तवन आहे.

जय श्री ललितांबा !